निरीक्षण अधिकारी (पुरवठा) / परिमंडळ अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील पदोन्नतीच्या निवडसूचीतून नाव वगळण्याबाबत......
निवडसूची सन २०२२-२३.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- पदोन्न-२०२४/प्र.क्र.६०/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र. ३०३/का.१२, दि. १२.०९.२०१६.
२) अ.ना.पु. व ग्रा. सं. वि., शासन आदेश, क्र. पदोन्न-२०२४/प्र.क्र. ६०/ना.पु.१५,दि. ०६.०९.२०२४.
३) अ.ना.पु. व ग्रा. सं. वि., शासन पत्र क्र. पदोन्न-२०२४/प्र.क्र. ६०/ना.पु.१५,दि. २०.०१.२०२५.
४) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांचे आदेश क्र. पुरवठा/कार्या-१६(१)/कावि.४६/२०२५, दि.२३.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील दि. ०६.०९.२०२४ च्या शासन आदेशान्वये, पुरवठा निरीक्षक, गट-क (वेतनश्रेणी एस-१० : २९२००-९२३००) या निम्न संवर्गात कार्यरत कर्मचाऱ्यांना निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१४ : ३८६००-१२२८००) या वरिष्ठ संवर्गात निवडसूची सन २०२२-२३ मधून पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात व निवडसूची सन २०२३-२४ मधून सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे.

२. श्री. अंकेश बबनराव शिरभाते, पुरवठा निरीक्षक, गट-क यांना निवडसूची सन २०२२-२३ मधून शासन आदेश दि.३०.०८.२०२४ व शासन आदेश, दि.६.०९.२०२४ अन्वये निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब संवर्गात नियमित पदोन्नती देऊन नाशिक विभागातील ता. भडगांव, जि. जळगांव येथे पदस्थापना देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन श्री. शिरभाते हे दि.१३.०९.२०२४ रोजी ता. भडगांव, जि. जळगांव येथे निरीक्षण अधिकारी पदावर रुजू झाले.

३. तथापि, श्री. शिरभाते यांनी कौटुंबिक / आई-वडीलांच्या वैद्यकिय कारणास्तव निरीक्षण अधिकारी, गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१४ : ३८६००-१२२८००) या वरिष्ठ संवर्गातील पदोन्नती नाकारली आहे. सबब, सदर कर्मचाऱ्याचे नांव सन २०२२-२०२३ या निवडसूचीतून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन आदेश :-**

क्षेत्रिय पुरवठा यंत्रणेतील श्री. अंकेश बबनराव शिरभाते, पुरवठा निरीक्षक, गट-क (वेतनश्रेणी एस-१० : २९२००-९२३००) यांनी निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१४ : ३८६००-१२२८००) या पदावरील पदोन्नती नाकारली असल्याने, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये त्यांचे नांव सन २०२२-२०२३ या निवडसूचीतून वगळण्यात येत आहे.

२. निवडसूची सन २०२२-२३ मधून नाव वगळण्यात येत असलेल्या श्री. शिरभाते यांचा पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूचीमध्ये (सन २०२३-२०२४ व सन २०२४-२०२५) विचार न करता तिसऱ्या निवडसूची वर्षाच्या (सन २०२५-२०२६) निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) या पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल. तसेच, निवडसूची सन २०२२-२०२३ मधून नांव वगळण्यात येत असलेल्या

श्री.शिरभाते यांना सन २०२३-२०२४ व सन २०२४-२०२५ या दोन निवडसूचीतील अधिकाऱ्यांचा मानीव दिनांक प्राप्त होणार नाही.

३. श्री. शिरभाते यांची निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील सेवाज्येष्ठता ही ज्यावेळी ते पुढील पदोन्नतीस पात्र ठरतील व प्रत्यक्ष पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून विचारात घेतली जाईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०२५०२२११८१८३४१२०६ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.02.21 18:20:45 +05'30'

**( पूजा मानकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री. अंकेश बबनराव शिरभाते, पुरवठा निरीक्षक.

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा), नागपूर.
२. निवडनस्ती (ना.पु. १५)